कृषि व पदुम विभागाच्या अधिपत्याखालील विद्यापीठाअंतर्गत महाविद्यालयीन इमारतींच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकाच्या छाननीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून आकारण्यात येणा-या छाननी शुल्कातून सूट देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि -२०११/प्र. क्र. ६९/८-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ०२ मे, २०१७.**

**प्रस्तावना :-**

कृषि महाविद्यालयांच्या बांधकामाचे प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर केले असता, सदर बांधकामाची अंदाजपत्रके संबंधित प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याकडून छाननी करुन घेऊन त्यांच्या साक्षांकनाने सादर करण्याच्या सूचना देण्यांत येतात. त्याकरिता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंत्याकडून सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील परिशिष्ट - ५, परिच्छेद - १६ (४) नुसार अंदाजपत्रकाच्या एकूण रक्कमेच्या १.२५ टक्के छाननी शुल्क आकारण्यात येते. मागिल तीन वर्षांत कृषि विद्यापीठांतर्गत बांधकामांना मागणीच्या तुलनेत अतिशय अल्प योजनांतर्गत तरतूद उपलब्ध करुन दिल्याने कृषि विद्यापीठांच्या स्तरावर निधीची कमतरता भासत असून त्यांच्याकडून अतिरिक्त योजनांतर्गत अनुदानाकरीता मागणी करण्यांत येते. कृषि विद्यापीठांतर्गत बांधकामांना शासन स्तरावरुन अनुदान देण्यांत येत असल्याने सदर बांधकामे शासनाच्या मालकीची असतात या बाबी लक्षात घेता, चारही कृषि विद्यापीठे व महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांना बांधकामाच्या अंदाजपत्रकांच्या छाननीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ट - ५, परिच्छेद - १६ (४) नुसार आकारण्यात येणा-या अंदाजपत्रकाच्या एकूण रक्कमेच्या १.२५ टक्के दराने प्रकल्प छाननी फी मधून सूट देण्याबाबतचा प्रस्ताव शासन स्तरावर विचाराधीन होता. त्यानुसार शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी; डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली; डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला; वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी व महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठांतर्गत बांधकामांना शासन स्तरावरुन अनुदान देण्यांत येत असल्याने व सदर बांधकामे शासनाच्या मालकीची असल्याने सदर बांधकामांच्या अंदाजपत्रकांच्या छाननीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ट - ५, परिच्छेद - १६ (४) नुसार अंदाजपत्रकाच्या एकूण रक्कमेच्या १.२५ टक्के दराने आकारण्यात येणा-या प्रकल्प छाननी फी शुल्कातून सूट देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२७ / इमारती-२, दिनांक ९/११/२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०५०२१५१५५१९७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या अदेशानुसार व नांवाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=af336b9b5cf884e0df83ac0f426fe20d17c54caf7b5d1c87a713842aed4eda25, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.05.02 15:27:00 +05'30'

(प्र.शं.शेटे)
**सहसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ३२,
प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ३२,
सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी
कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर,
मा.मंत्री (कृषि) / मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
कृषि आयुक्त (अेजी १० सेल) महाराष्ट्र शासन, पुणे (खर्च ताळमेळ शाखा),
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे,
कुलसचिव / नियंत्रक / विद्यापीठ अभियंते, सर्व कृषि विद्यापीठे,
सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
वित्त विभाग (व्यय-१ /अर्थसं -१३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक-२ अे /६ अे / ७ अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
निवडनस्ती.